**मा.औद्योगिक न्यायालय, औरंगाबाद यांच्या दि.२७/२/२०१८ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार श्री.बापु आबाराव जाधव यांना ग्रेड-१ मजूर म्हणून नियुक्ती व अनुषंगीक लाभ अदा करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-२०१९/प्र.क्र.९/१३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २६ नोव्हेंबर, २०२१

**वाचा:-**

१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. अेपीटी-१०१०/६४९०/ताबिके बीड/प्र.क्र.२७/ आस्था-३/२०५११, दि.२८/८/२०२०.
२) मा. कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे दाखल युएलपी क्र. ६३/१९७९ बाबत दिलेला दि.३१/१/१९८३ चा न्यायनिर्णय.
३) मा. उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे दाखल रि.पि. क्र. ३२४/१९८३ बाबत दिलेला दि.१७/९/१९९० चा न्यायनिर्णय.
४) मा. औद्योगिक न्यायालय, औरंगाबाद येथे दाखल युएलपी क्र. १६९/२०१० बाबत दिलेला दि.२७/२/२०१८ चा न्यायनिर्णय.

**प्रस्तावना:-**

श्री.बापु आबाराव जाधव यांना दि.२९/६/१९७९ रोजी कामावरुन कमी/बडतर्फ करण्यात आलेले होते. त्या विरोधात श्री.जाधव यांनी मा.कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे तक्रार युएलपी क्र.६३/१९७९ दाखल केले होते. सदर प्रकरणाच्या सुनावणी वेळी विभागाने योग्य पुरावे सादर न केल्यामुळे दि.३१/१/१९८३ रोजी श्री.जाधव यांच्या बाजूने निकाल देण्यात आलेला होता. या विरुध्द मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्र.३२४/१९८३ दाखल करण्यात आले. सदर प्रकरणी दि.१७/९/१९९० रोजी मा.उच्च न्यायालयाने मा.कामगार न्यायालय, औरंगाबाद यांचा दि.३१/१/१९८३ रोजीचा निकाल कायम ठेवून रिट पिटीशन खारीज केले होते. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, बीड यांनी दि.३०/६/२०१० रोजीच्या आदेशान्वये श्री.जाधव यांना ग्रेड-१ मजूर म्हणून तात्पुरती नियुक्ती दिलेली होती. त्यानुसार श्री.जाधव हे दि.१/७/२०१० रोजी कामावर हजर झाले होते. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, बीड यांनी दि.२४/११/२०१० रोजीच्या आदेशान्वये दिलेले नियुक्ती आदेश रद्द केले. सदर आदेशा विरुध्द श्री.जाधव यांनी मा.औद्योगिक न्यायालय, औरंगाबाद येथे युएलपी क्र.१६९/२०१० दाखल केले. सुनावणीच्या वेळी विभागातर्फे देण्यात आलेल्या साक्षीत श्री.फड यांनी मान्य केले की, दि.२४/११/२०१० रोजीच्या आदेशान्वये दिलेली नियुक्ती रद्द करण्यापूर्वी श्री.जाधव यांना नोटीस देण्यात आलेली नव्हती. तसेच कोणतीही चौकशी करण्यात आलेली नव्हती. याचप्रमाणे अन्य प्रकरणात श्री.दत्ता कदम व इतर यांच्या प्रकरणी मा.औद्योगिक न्यायालयाच्या आदेशान्वये त्यांना ग्रेड-१ मजूर म्हणून नियुक्ती देण्यात आली होती. समान काम असल्याने श्री.जाधव यांची नियुक्ती रद्द करणे ही चुकीची पध्दत असल्याचे मा.न्यायालयाने नमूद केले. प्रतिवादी हे 'उद्योग' नाही प्रतिवादीचे मुख्य कार्य शेतकऱ्यांना झाडे

पुरविणे व इतर संबंधित कामे असा आहे, त्यातून महसूल गोळा केला जातो. तक्रारदार हा संबधित क्षेत्रावर काम करीत असून वरिष्ठ कामगार आहे. मा.न्यायालयाने सदर निरीक्षणे नमूद करुन दि.२७/२/२०१८ रोजी निकाल दिलेला आहे.

सदर न्यायनिर्णयानुसार श्री.जाधव यांना पूर्वलक्षी प्रभावाने ग्रेड-१ मजूर पदावर नेमणूक देण्याच्या अनुषंगाने उपलब्ध असलेल्या कागदपत्रानुसार त्यांची जन्मतारीख दि.१९/६/१९५६ अशी असून मा.कामगार न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयाच्या दि. ३१/१/१९८३ रोजी श्री.बापू जाधव यांनी वयाची २७ वर्षे पूर्ण केलेली होती. पण दि.२७/२/२०१८ रोजी मा.उच्च न्यायालय औरंगाबाद यांनी दिलेल्या न्यायनिर्णयाच्या दिवशी त्यांनी वयाची ६२ वर्षे पूर्ण केलेली आहेत. श्री.बापू जाधव यांनी प्रथम तक्रार दाखल केलेल्या दिवशी वयाची २७ वर्षे पूर्ण केलेली असल्याने व मजूरांच्या सेवाप्रवेश नियमातील नियम क्रमांक ३(१)(बी)(क) तरतूदीनुसार नियुक्ती प्राधिकारी सक्षम आहे. हे लक्षात घेता श्री. जाधव यांना दि.३०/६/२०१० पासून पूर्वलक्षी प्रभावाने ग्रेड-१ मजूर यापदावर पदोन्नती देवून स्थायीकरणाचे सर्व लाभ देण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी प्राप्त झाला होता. त्याअनुषंगाने श्री.बापु आबाराव जाधव यांना पूर्वलक्षी प्रभावाने नियुक्ती व अनुषंगीक लाभ अदा करण्यास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय:-**

जिल्हा अधिक्षक कृषी आधिकारी, बीड यांच्या अहवालानुसार ग्रेड-१ मजुराचे ३ पदे रिक्त असून त्यापैकी एका पदावर श्री.बापु आबाराव जाधव यांना नियुक्ती देणे शक्य होईल. मा.न्यायालयाने दि.२७/२/२०१८ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार पूर्वलक्षी प्रभावाने दि.३०/६/२०१० रोजीचे वय ५४ वर्षे आहे. त्यानुसार ते दि.३०/६/२०१६ रोजी नियत वयोमानाने सेवानिवृत्त होतात. मजूरांच्या सेवाप्रवेश नियमातील नियम क्रमांक ३ (१) (बी) (क) तरतूदीनुसार ४५ वर्षे व त्यापुढील वयाच्या मंजूरीबाबत प्रशासकीय विभागाच्या मान्यतेने नियुक्ती देता येते. हे लक्षात घेता श्री.जाधव यांना दि.३०/६/२०१० पासून ग्रेड-१ मजूर या पदावर नियुक्ती देऊन स्थायीकरणाचे सर्व लाभ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री.जाधव यांना दि.३०/६/२०१० पासून पूर्वलक्षी प्रभावाने ग्रेड-१ ,रोजंदारी मजूर म्हणून नियुक्ती देवून त्यांच्या मजूरी/ वेतनाच्या फरकाच्या रकमेची परिगणना करून सदर रक्कम मुख्य लेखाशिष २४०१ ०२६१ खाली (०१-वेतन) या बाबी अंतर्गत अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. न्यायालयीन प्रकरणात वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, दि.१७/४/२०१५ भाग पहिला, उप विभाग-दोन, अनु.क्र.७ नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पुर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. आयुक्त कृषि कार्यालयाने मा.न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार देय ठरणारी रक्कम शासनाचे प्रचलित नियम, अटी व शर्ती व आदेशांचे अनुपालन करण्यात यावे. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

५. यावरील येणारा खर्च मागणी क्र.डी-३, २४०१-पिकसंवर्धन, १०३- बी बियाणे, १०३ (००) (०१) तालुका बीजगुणन प्रक्षेत्र (२४०१ ०२६१) (०१-वेतन) या लेखाशिर्षखाली सन २०२१-२२ करिता उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२८५/२०२१/व्यय-१, दि.२०/९/२०२१ तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.३१०/२०२१/विनिमय, दि.२८/१०/२०२१ रोजीचे अभिप्राय व विधी व न्याय विभाग यांचे अनौपचारीक संदर्भ क्र. 365/338/Civil/Confl./2020/'A' Br. Dated 26 August, 2021 रोजीच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२६११२८२४२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.11.26 11:30:40 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत अग्रेषित:-**

१) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य पुणे.
२) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई/ नागपूर.
४) सह संचालक (आस्थापना),कृषि आयुक्तालय,पुणे.
५) सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन, ५ वा माळा मुंबई-३२.
६) विभागीय कृषि सह संचालक, औरंगाबाद.
७) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, बीड,
८) जिल्हा कोषगार अधिकारी, बीड,
९) निवड नस्ती-१३-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.